अनुसूचित जमाती प्रवर्गासाठी प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना - प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) अंतर्गत सन २०२१-२२ मधील निधी वितरण.
(केंद्र हिस्सा - २४०१ A ६१९)
(राज्य हिस्सा - २४०१ A ४६८)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र. ७ /कार्यासन ६**
मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२
दिनांक : - ३१ मार्च, २०२२.

**वाचा :-**

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१, दि.१४.१०.२०२१, दि.०३.०२.२०२२ व दि.१७.०३.२०२२.
२) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.७/दि.८.७.२०२१ व दि.३०.३.२०२२.
३) केंद्र शासन, कृषी मंत्रालय यांचे पत्र क्र.F.No.18-10/2020-RFS-III, दि.२२.०२.२०२२.
४) आदिवासी विकास विभाग ज्ञापन क्र.बीयुडी-२०२१/प्र.क्र.७/कार्या-६, दि.३१.३.२०२२.
५) कृषी व पदुम विभागाची नस्ती क्र.प्रकृसिं-२०२२/प्र.क्र.५२ (भाग-३)/१४-अे.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत कृषी व पदुम विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येत असलेल्या केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना - प्रति थेंब अधिक पीक या योजनेकरीता सन २०२१-२२ करीता प्राप्त केंद्र हिस्सा रु.६००.०० लाख व समरुप राज्य हिश्श्याकरीता रु.४००.०० लाख असा एकूण रु.१०००.०० लाख इतका निधी पुनर्विनियोजनाद्वारे एकात्मिक फलोत्पादन विकास अभियान या योजनेच्या उपलब्ध बचतीमधून वितरणाचा प्रस्ताव संदर्भाधीन क्र.५ अन्वये सादर प्रस्तावास वित्त विभागाने सहमती दिलेली आहे. वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन निधी वितरणाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ याखाली मुख्य लेखाशीर्ष २४०१, पीक संवर्धन - प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना - प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) करीता केंद्र हिस्सा रु.६००.०० लाख व व समरुप राज्य हिश्श्याकरीता रु.४००.०० लाख असा एकूण रु.१०००.०० लाख इतका निधी बचतीमधून सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या उपलब्ध तरतुदींतून खालीलप्रमाणे वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष व केंद्र / राज्य हिस्सा | बाब | सन २०२१-२२ मधील सुधारीत अंदाज | आतापर्यंत वितरीत निधी | सदर शा.नि. अन्वये वित रीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना - प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्म सिंचन) | २४०१ A ६१९ केंद्र हिस्सा (६० टक्के) | ३३, अर्थसहाय्य | २४००.०० | २४००.०० | ६००.०० |
| | २४०१ A ४६८ राज्य हिस्सा (४० टक्के) | | १६००.०० | १६००.०० | ४००.०० |
| **एकूण** | | | **४०००.००** | **४०००.००** | **१०००.००** |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.१०००.०० लाख (अक्षरी रुपये दहा कोटी फक्त)** इतका निधी प्रशासकीय विभागप्रमुख म्हणून सचिव, कृषी विभाग यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे.

३. सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन आदेशातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्याची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी व निधी उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील निधी वितरणासाठी प्रस्ताव सादर करावा.

५. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

६. आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदीतून आदिवासी उपयोजना क्षेत्रात पायाभूत सुविधा निर्माण करण्याबाबतच्या तसेच वैयक्तिक लाभाच्या योजना घेण्यात याव्यात तथापि, आदिवासी उपयोजना बाहय क्षेत्रात मात्र वैयक्तिक लाभाच्याच योजना घेण्यात याव्यात.

७. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४२२/व्यय-१४, दि.३१.०३.२०२२ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३११६३६१४२५२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAVINDRA D AUTE

Digitally signed by RAVINDRA D AUTE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=f05a6913f9dee1f453c9a1c5a89d8c4897737ba8e4ac0edf3f2c6e69e25f4108, pseudonym=C4ECFFC229308BD3BD1E334FAC78848FBF7F7613, serialNumber=CA98EFAC317508AB9B5820B47955BC1BABB173F20D25ABD816ED91A9B6B0F16C, cn=RAVINDRA D AUTE
Date: 2022.04.04 12:29:17 +05'30'

**(रविंद्र दि. औटे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. सचिव, कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
५. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग
६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
७. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
८. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.